**कोकण विभागातील महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिका-यांच्याा बदल्या/नियुक्त्या.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन आदेश, क्रमांक : मविसे-१०/२०११/प्र.क्र.८६/आस्था-३अ
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ सप्टेंबर, २०११.

**संदर्भ :** शासन आदेश क्र. मविसे-१०/२०११/प्र.क्र.४५/आस्था-३अ, दिनांक १.८.२०११

**आदेश :-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या पूर्वमान्यतेने कोकण विभागातील महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील एकूण १० अधिकाऱ्यांच्या बदल्या संदर्भाधीन दिनांक १.८.२०११ च्या आदेशान्वये करण्यात आल्या आहेत. सदर आदेशातील अ.क्र.५ येथील अधिकारी श्री. बी. डी. इंगळे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, तळा, जि. रायगड यांची बदली गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पोलादपूर, जि.रायगड या रिक्त पदी करण्यात आली आहे. तथापि, श्री. इंगळे यांच्या सदर बदलीस या आदेशान्वये पुढील आदेश होईपर्यंत स्थगिती देण्यात येत आहे.

२. संबंधित अधिकारी यांनी याची कृपया नोंद घ्यावी. तसेच संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी वरील आदेशाच्या अनुषंगाने योग्य ती नोंद घेऊन उचित कार्यवाही तात्काळ करावी.

३. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२८१६४७५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( रि. इ. शेख )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड.
३. महालेखापाल- १ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. संबंधित अधिकारी द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, रायगड यांचे मार्फत
५. मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
७. मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
८. कार्यासन क्रमांक : आस्था - २, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
९. निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३अ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.